भारतीय प्रशासन सेवेतील अधिकाऱ्यांनी
त्यांच्या मालमत्तेविषयी वार्षिक विवरणपत्र
भरण्याबाबत

# महाराष्ट्र शासन

सामान्य प्रशासन विभाग,
शासन परिपत्रक क्रमांक : भाप्रसे-४५०४/प्र.क्र.७१/२००४/नऊ,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२,
दिनांक : 26 MAY 2004

## परिपत्रक

अखिल भारतीय सेवा (वर्तणूक) नियम,१९६८ मधील नियम १६(२) मधील तरतूदीनुसार भारतीय प्रशासन सेवा अधिकाऱ्यांना मालमत्तेविषयी (Immovable Property) वार्षिक विवरणपत्रे दोन प्रतीत सादर करणे बंधनकारक आहे. सदर विवरणपत्र प्रथमतः भारतीय प्रशासन सेवेत प्रवेश करतेवेळी व तद्नंतर दरवर्षी जानेवारी महिन्यात दि.१ जानेवारी रोजी त्यांच्या व त्यांच्या कुटुंबियाच्या नावे संपादित केलेल्या मालमत्तेबाबतचे आहे.

सदर विवरणपत्रे सीलबंद लखोट्यात सादर करावयाची असून, त्यावर पुढील माहिती नमूद करणे आवश्यक आहे :-

Statement of Immovable Property furnished under rule १६(२) of All India Services (Conduct) Rules १९६८ for the year/as on --

Name of the Office
Service Cadre
Designation of off

२. राज्य संवर्गात कार्यरत असणाऱ्या भारतीय प्रशासन सेवेतील अधिकाऱ्यांकडून अशी विवरणपत्रे शासनाकडे प्राप्त होतात. तथापि काही विवरणपत्रांची तपासणी करण्यात आली असता त्यामध्ये पुढील प्रमाणे त्रुटी आढळून आल्या :-

१) विवरणपत्रे पूर्णतः न भरणे
२) विवरणपत्रे सीलबंद लखोट्यात न पाठविता तशीच पाठविणे.
३) एखाद्या वर्षाचे विवरणपत्र भरताना त्यावर्षी कोणताही व्यवहार केला नसल्यास, माहिती "निरंक आहे" (Nil) अथवा "गेल्या वर्षाप्रमाणेच" (as per the statement of last year असे भरुन पाठविणे.

३. याबाबत असे स्पष्ट करण्यात येते की, एखाद्या वर्षाचे विवरणपत्र पाठविताना अधिकाऱ्याने त्या विवरणपत्रात नमूद केलेल्या दिनांकाच्या दिवशी त्याच्या व त्याच्या कुटुंबियांच्या नावे संपादित केली असलेली मालमत्ता नमूद करावयाची असते. थोडक्यात, एखाद्या वर्षी भारतीय प्रशासन सेवा अधिकाऱ्याने कोणताही यासंबधातला व्यवहार केला नसेल, तरी त्यावेळी त्यापूर्वी जाहीर केलेली मालमत्ता त्याच्या व त्याच्या कुटुंबियाच्या नावावर असते. त्यामुळे त्याने "निरंक" उल्लेख न करता किंवा "गेल्या वर्षाप्रमाणेच (as per the statement of last year) अशा प्रकारे उल्लेख न करता, त्याने मागील विवरणपत्रात दिलेली माहिती पुन्हा देणे अत्यावश्यक आहे.

४. वरील विवेचन लक्षात घेता सर्व भारतीय प्रशासन सेवा अधिकाऱ्यांना असे कळविण्यात येते की, भविष्यात मालमत्तेविषयी विवरणपत्रे सादर करताना उपरोक्त उल्लेख केलेल्या त्रुटी राहणार नाहीत याची दक्षता घ्यावी. तसेच परि.३ मधील सूचना लक्षात घेऊन विवरणपत्रे भरावीत.

५. राज्य नागरी सेवेतून भारतीय प्रशासन सेवेत पदोन्नत झालेल्या अधिकाऱ्यांना याद्वारे असे स्पष्ट करण्यात येते की, त्यांचा भारतीय प्रशासन सेवेतील प्रवेशाचा दिनांक त्यांना परिविक्षाधीन नेमल्याचा दिनांक असल्याने त्या दिनांकाला त्यांच्या व त्यांच्या कुटुंबियाच्या नावे संपादित केली असलेली मालमत्ता विहित नमुन्यात प्रथमतः जाहीर करणे आवश्यक आहे. तदनंतर त्यापुढील वर्षाच्या जानेवारी महिन्यात वर नमूद केल्याप्रमाणे विवरणपत्रे सादर करणे बंधनकारक आहेत याची त्यांनी नोंद घ्यावी.

६. याबाबत आणखी असे नमूद करण्यात येते की, बहुतांश अधिकारी जेव्हा स्थावर मालमत्ता संपादीत करतात, त्यावेळेस त्याची माहिती व्यवहार केल्याच्या दिनांकापासून १ महिन्याच्या आत त्याने शासनास स्वतंत्रपणे कळविणे बंधनकारक आहे. तसेच त्यावर्षी स्थावर मालमत्तेचे वार्षिक विवरणपत्र भरताना अखिल भारतीय सेवा (वर्तणूक) नियम १९६८ मधील नियम १६ मधील तरतुदीनुसार आवश्यक तेथे शासनाची पूर्वपरवानगीने घेतल्याची खातरजमा भारतीय प्रशासन सेवेतील अधिकाऱ्याने करावी.

७. विवरणपत्रे विहीत कालावधीत सादर न केल्यास केंद्र शासनाने त्यांच्या क्रमांक ११०१७/७४/९३-एआयएस (तीन), दि. ४/१/१९९४ पत्रात नमूद केल्यानुसार, संबंधित भारतीय प्रशासन सेवेतील अधिकारी शिस्तभंगविषयक कारवाईस पात्र ठरेल याची नोंद घ्यावी.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

( सीमा व्यास )
उप सचिव,महाराष्ट्र शासन

प्रत,

सर्व भा.प्र.से.अधिकारी.
निवड नस्ती.